**राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यान्वित करण्यात आलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत महानगरपालिका / नगरपालिका यांनी हाती घ्यावयाच्या विकासकामांना संबंधित जिल्हाधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

अल्पसंख्यांक विकास विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक :अविवि-२०१०/१/प्र.क्र.५/का.७

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ९ फेब्रुवारी, २०१०

संदर्भ :-१.अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.४३/०९/का.७ दि.९ फेब्रुवारी,२००९.

२.अल्पसंख्याक विकास विभाग,शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.४३/०९ /का.७ दि.५जून, २००९.

३. .अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.२३५/०९ /का.७,दि.२१ ऑगस्ट,२००९.

## परिपत्रक

राज्यातील अल्पसंख्याक संकेद्रित क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सन २००८-०९ या वर्षापासून क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २००९-१० या वर्षात देखील राबविण्यास मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सन २००८-०९ या वर्षात राज्यातील विविध महानगरपालिका / नगरपालिका यांना संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळामार्फत रु. १८.३५ कोटी एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता.या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाच्या विकासकामांना संबंधित महानगरपालिका / नगरपालिका यांनी त्या त्या जिल्हयांच्या जिल्हाधिकाऱ्यांची प्रशासकीय मान्यता घेण्याबाबत संबंधितांना सुस्पष्ट सूचना देण्याची बाब विचाराधीन होती.

अल्पसंख्याक विकास विभागाने कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका यांना ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी महानगरपालिका / नगरपालिका यांच्याकडून निधी खर्च होत आहे किंवा कसे यावर देखरेख ठेवण्याच्या दृष्टीने तसेच हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगती बाबत संनियंत्रण (monitoring) करण्याच्या दृष्टीने संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी संनियत्रण प्राधिकारी (Monitoring Authority) म्हणून काम पाहणे अपेक्षित आहे. सबब अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय, दि. ५ जून,२००९ अन्वये राज्यातील ज्या महानगरपालिका / नगरपालिका यांना ज्या विशिष्ट विकासकामांसाठी अनुदान वितरित करण्यात आले आहे, त्यांनी विकासकामे हाती घेण्यापूर्वी संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहे त्या जिल्हयांच्या जिल्हाधिकाऱ्याची प्रशासकीय मान्यता घ्यावी. ज्या महानगरपालिका / नगरपालिका यांनी

जिल्हाधिकाऱ्यांच्या प्रशासकीय मान्यतेशिवाय याआधीच विकासकामे हाती घेतली आहेत, त्यांनी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांची कार्योत्तर प्रशासकीय मान्यता घ्यावी.

संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मान्यता देताना महानगरपालिका / नगरपालिका यांना ज्या प्रयोजनासाठी शासनाने निधी मंजूर केला आहे, त्याच प्रयोजनासाठी निधी वापरला जाणार/जात आहे याबाबतची खातरजमा करावी. संबंधित महानगरपालिका / नगरपालिका यांना देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या आदेशाची प्रत त्या त्या जिल्हाधिकाऱ्यांनी अल्पसंख्याक विकास विभागास देखिल पृष्ठांकित करावी. तसेच महानगरपालिका / नगरपालिका यांनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा. अशीच कार्यपध्दती चालू आर्थिक वर्षात व त्यापुढील कालावधीत देखिल अवलंबण्यात यावी.

सर्व जिल्हाधिकारी , आयुक्त, महानगरपालिका व मुख्याधिकारी, नगरपालिका यांना सूचित करण्यात येते की, त्यांनी या शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०१००२०९१३२१११००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( उ.सं. दांडेकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सर्व जिल्हाधिकारी,
आयुक्त, सर्व महानगरपालिका,
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका,
निवड नस्ती